मच्छिंद्रनाथ महाराज म्हणजे जगत कल्याणास्तव अवतार स्वरुपात प्रकट झालेल्या नवनारायणांपैकी आद्य विभूती आहे. विधिलिखिताने त्यांच्या प्रकटीकरणानंतर बंगाल प्रांतात दुसरे हरिनारायण गोरक्ष म्हणून नाथांच्या कृपासामर्थ्याने तहत बारा वर्षे गोशाळेच्या कोपऱ्यात गोवऱ्याच्या ढिगाऱ्यांत स्वतःच्या उद्धराची प्रतीक्षा करीत होते. एका तपानंतर विरपपत्नी सरस्वतीच्या दुर्दैवाने ती पुत्रसुखपासून वंचित झाली पण नाथ मात्र गोरक्ष या बाळयोग्याला घेऊन तीर्थाटनास निघाले. नाथांनी गोरक्षाला चौदा विद्या आणि चौसष्ट कलांमध्ये पारंगत केले. नाथ गोरक्षास घेऊन तीर्थाटनास निघाले. मार्गात कनकगिरी गावात गोरक्षाने प्रसंगोपात आपली श्रद्धा गुरुनिष्ठा, आज्ञापालनाच्या आचरणाकडे नाथांचे लक्ष्य वेधले. मार्गातील एका गावात मुक्कामी असताना मुलांच्या सहजसुलभ क्रीडानंदात संप्रदायाचे गहीनीनाथ म्हणजेच नवनारायाणांपैकी करभंजन नारायण यांचे पृथ्वीवर आगमन झाले. बालरूपात असलेल्या गहीनीला धर्माच्या मातेकडे सुपूर्द करून मच्छिंद्र आणि गोरक्ष पुढे निघाले. वाटेत नाथांना जाणीव झाली की तपाचरणाच्या अभावी गोरक्षामध्ये परिपक्वता आलेली नाही म्हणून गोरक्षाला तपाला बसविण्यासाठी ते बद्रीकाश्रमी हिमालयात निघाले आहेत.

पृथ्वीतालावरील तीर्थक्षेत्रांना भेटी देत हे दोघे गुरु शिष्य हिमालयाच्या मार्गाकडे बद्रीकाश्रमी जाण्यासाठी निघाले आहेत. अनादी कालांपासून हिमालयाचे स्वतःचे असे वैशिष्ट्य आहे. बर्फाच्छादित महमेरूवर निसर्गाचे वरदान भरभरून मिळाले आहे. अनेक नद्यांचे उत्पत्तीस्थान, विपुल वनश्री आणि परमेश्वराची आराधना करण्यासाठीची शांतता यामुळेच प्रत्यक्ष श्रीशंकर बद्रीकेदार या नावाने तेथे वास्तव्यास आहेत. मच्छिंद्र आणि गोरक्ष हे गुरुशिष्य येथे येऊन श्रीशिवाचे स्तवन करू लागले. त्यांच्यावर प्रसन्न होऊन महादेव प्रकट झाले. जिव्हाळयाने त्यांचे स्वागत केले. क्षेमकुशल विचारले. बालयोगी गोरक्षास ममतेने कुरवाळले आणि म्हणाले, "हरी नारायणा! आपण अवतीर्ण झालात तर?"

महादेव मच्छिन्द्रांस म्हणाले, "मच्छिंद्रा! हा तुझा शिष्य सकळ ब्रह्मांडतारक होईल. कनकगिरी गावात तू याला विद्यासंपन्न करून देवांचे वरदान प्राप्त करून दिलेस, त्यावेळी मी त्याला प्रत्यक्षात पहिले होते. आता याला तपश्चर्येसाठी बसवणार आहेस ही फार चांगली गोष्ट आहे. याचे तप झाल्यानंतरच हा खऱ्या अर्थाने बलशाली होईल. कारण पाण्याशिवाय कोरडी नदी, पाण्याअभावी शुष्क आणि पर्णविहीन वृक्ष, वृक्षवल्लींचे अस्तित्व नसलेले ओसाड गाव, नाकाशिवाय कुरूप स्त्री, नक्षत्रांशिवाय आकाश; तसेच तपाशिवाय ज्ञान अशोभनीय आहे.

नाथ म्हणाले, "महादेवा! तपाचे क्लेश या बालवयात कसे सहन करील याची मला चिंता वाटते, त्यावर श्रीशिव म्हणाले, "तुझ्यासारखा सिद्धगुरुचा वरदहस्त या बाळयोग्याच्या मस्तकावर असल्याने अति दुःखदायक तपक्लेश होणार नाहीत. या शिवाय मी आहेच! मनामध्ये कोणताही किंतु न ठेवता, आशंका, पूर्वग्रह न ठेवता तू याला तपाला बसव. मी स्वतः लक्ष ठेऊन याची काळजी घेईन."

यावर मच्छिंद्रनाथ सद्गदीत होऊन म्हणले, "आदिनाथ! तुमचा आशीर्वाद असल्यावर मला चिंता नाही. तुमच्या आशीर्वादाने जन्मांधलासुद्धा दृष्टीलाभ होईल. नाथांना परमावधीचा आनंद झाला. त्यांच्या मनासारखे घडले होते. त्यानंतर त्यांनी उत्तम वेळ, दिवस, नक्षत्र, ग्रहबळ, तिथी, महिना यांची मेळ घालून गोरक्षाला तपश्चर्येसाठी बसविले. लोखंडाच्या टोकदार खिळयावर डाव्या पायाचा अंगठा टेकवून, अन्नत्याग करून केवळ फळ पर्ण आणि प्रसंगी वायू भक्षण करीत आकाशीच्या सूर्याकडे दृष्ठी एकाग्र करून ईश्वरचिंतन करायचे, अशा खडतर तपाचरणासाठी बालयोगी

गोरखशाची सिद्धता झाली आणि तप सुरु झाल्यावर शुभचिंतन व्यक्त करून मच्छिंद्रनाथ श्रीशिवाचा निरोप घेऊन तीर्थाटनासाठी मार्गस्थ झाले. नाथांना दिलेले आश्वसन कृतीत आणतांना श्रीशंकर रात्रंदिवस गोरक्षाच्या सान्निध्यात असायचे. रात्रंदिवस गोराक्षाजवळ बसत असत. त्याची सेवा आणि संकटनिवारण करावायचे हा एक छंदच महादेवांना लागला.

मच्छिंद्रनाथांनी या भ्रमंतीमध्ये काश्मीर, गया, प्रयाग, काशी, अवंतिका, मिथिला, मथुरा, अयोध्या, द्वारका, महाकालेश्वर, सोमनाथ, ब्रह्मगिरी, त्र्यंबकेश्वर, घृष्णेश्वर, भीमाशंकर, औंढ्या, नागनाथ, पंढरपूर, चौदा शक्तिपीठे, कार्तिक, शेषाद्री, मल्लिकार्जुन इत्यादी तीर्थक्षेत्रांना भेटी देत, पवित्र नद्या आणि सरोवरांत स्नानसंध्या, पुजाअर्चा लोककल्याणादी सत्कृत्ये करीत बारा वर्षांच्या कालावधीनंतर भ्रमंती करीत रामेश्वरास पोहचले. तिथे त्रिवेणी संगमावर स्नान करून रामेश्वराचे दर्शन घेतले. सेतुबंधावर हनुमंताचे दर्शन घेतले. हनुमंताने प्रेमभरात उरारी मिठी मारली आणि म्हणाले, "मच्छिंद्रनाथा! चोवीस वर्षानंतर आज तुझी भेट झाली. बारा वर्षांनी पर्वणकाली आळश्यालासुद्धा गंगा भेटते. तुझी आणि माझी भेट होण्यासाठी मला चोवीस वर्षे प्रतीक्षा करावी लागली. एक एक दिवस तळमळत घालवला. आज मन शांत झाले. हे योगद्रूमा महाराजा! मी वचनपुर्तीच्या भोवऱ्यात बुडलो आहे. त्यांतून तूच मला वाचवू शकतोस. तू मला स्त्री राज्यात जाण्याचे वचन दिले आहेस पण या दोन तपांच्या कालावधीत तू स्त्री राज्यांचे तोंडसुद्धा पाहिले नाहीस. आता तरी स्त्री राज्यात चल आणि मैनाकिनीची मनोकामना पूर्णकर. तू मला वचन दिले आहेस त्याची पूर्तता कर आणि मला मैनाकिनीच्या वचनातून मुक्त कर आणि तिचेही कल्याण कर. हे सर्व तूच करू शकतोस." नाथांकडे कोणतीही सांगण्याची सबब नसल्याने मारुतीरायाचे म्हणणे मान्य करण्याशिवाय पर्याय राहिला नाही. तीन दिवस मुक्काम करून दोघेही स्त्री राज्याकडे मार्गस्थ झाले.

मार्गातील तीर्थे करीत मारुतीराया आणि मच्छिंद्रनाथ वंग देशातील गौडबंगाल मागे टाकून स्त्री राज्यात प्रवेश करते झाले. राजधानीच्या शहरातील प्रशस्त राजमहालात स्त्री राज्याची स्वामिनी महापुण्यवान, तपस्विनी, ज्ञानधुरीणी, वैभवसंपन्न मैनाकिनी राणी राजसिंहसनावर विराजमान झाली होती. महाराणी मैनिकिनी प्राक्रमी आणि कलानिपुण होती. राज्यातील सर्व सुंदरींना हाताशी धरून राज्यकारभार सांभाळीत होती. तेथे पुरुषांचे आस्तित्वच नव्हते. पुरुषांची सर्व कामे स्त्रियांच करीत. छेडीदार, चोपदार, रत्नपारखी, सोनार, राउत, भांडारी, खजिनदार, फरसदार, यंत्रधारी, मंत्रधारी, सर्वमंत्री गण, प्रधान, शास्त्र निपुण कारभारी, कलाकुसरी कारागीर, लेखक, कवी, जासूद, हलकारे, राजवकील; इतकेच नव्हे तर सैनिकीदलांतही स्त्रियांचा समावेश होता. पायदळ, अश्वदलातील राउत हे पदसुद्धा या महिला राज्यातील वीरांगना भूषवित होत्या. गजदल, सारखाणी, चीत्तेवान, पहिलवान, दिवाण, सेनापतीसुद्धा, स्त्रीयांच होत्या. खिदमतगार, वदनकार, गायकवृंद, बातमीदार, हेर, क्रीडापटू, सिंपी, कुमार इत्यादी सर्व क्षेत्रात या राज्यातील वाकबगार महिला कार्यरत होत्या.

मारुतीराया आणि मच्छिंद्रनाथ यांच्या आगमनाने तेथे सर्वांना आनंद झाला. उभयतांना दोन सुवर्णासनावर बसवून त्यांचे षोडशोपचारे पूजन करण्यात आले. महाराणी मैनिकिनी नम्रतेने वंदन करीत म्हणाली, "महाराजा वायुनंदना! आपणांबरोबर दुसरे अतिथी कोण आहेत त्यांचा परिचय करून द्यावा."

"महाराणी! हे योगीराज मच्छिंद्रनाथ आहेत. तू तपश्चर्येने माझे वरदान प्राप्त केले होतेस. त्याच्या फलनिष्पत्तीची वेळ आज आली आहे. तुझी मनोकामना पूर्ण करण्यासाठी त्यांना मी येथे आणले आहे. शची आणि सहस्त्रनयन इंद्र, शिवअपर्णा या दैवी प्रेमिकाप्रमाणे मैनाकिनी मच्छिंद्र!! वज्रदेही मारुतीने अशाप्रकारे प्रसंगोचित परिचय करून दिला. तीन दिवसांच्या अतिथ्याच्या आस्वाद उपभोगून मारुतीराया पुन्हा रामेश्वरी सेतुबंधाजवळ येऊन श्रीरामाचा जप करीत बसला.

महाराज मच्छिंद्रास इथे राजविलासी वैभवांचा उपभोग घेऊ लागले. बसण्यासाठी सुवर्णसिंहसन, गळ्यात मौक्तिक मला, सुवर्णांचे अलंकार, कानात सुवर्णकुंडले, कशिदाकाराची भरजरी राजवस्त्रे; सर्वच शाही थाट माट होता. उर्वशीपेक्षाही देखण्या सेविका सेवेसाठी हजर होत्या. महाराजांच्या दरबारात आगमनाप्रसंगी या सेविका मोठ्या आवाजात पुकारा करून महाराजांच्या महानतेचे वर्णन करीत ललकारी करीत असत. नभांगणात चांदण्यामध्ये चंद्र शोभावा तद्‌वत महाराज मच्छिंद्र त्या ललनांमध्ये शोभत होते. मोठ्या कौशल्याने राज्यकारभारीची जबाबदारी पार पाडतांना त्यांनी स्वतःची क्षमता सिद्ध केली. परकीय आक्रमणाचे भय नसल्याने राज्याच्या सीमा सुरक्षित होत्या. महराजांनी मग कलागुणांच्या विकासास प्रोत्साहन दिले.

विद्‌याभ्यासी, शास्त्राभ्यासी, ज्योतिषी, भाविष्यवेते, व्याकरणाकार, कवी गीतकार गायक, नर्तक, कलावंत, वैदशास्त्रज्ञ, औषधशास्त्रज्ञ, रसायनशास्त्रज्ञ, कोकशास्त्रज्ञ, नाटककार, नाट्याभिनेते, धनुर्धर, घोडेस्वार, युद्धशस्त्रज्ञ इत्यादी स्त्री तज्ञांनी राज्यकारभारात सुसूमता आणून प्रगतीचा आलेख उंचावत नेला होता.

महाराणीसोबत बसून ध्युत खेळावे. हास्यविनोद करावा, सुख भोगावे, असा आनंदी दिनक्रमांचा काळ सरत होता. महाराणी मैनाकिनी गरोदर राहिली आणि नऊ मांस नऊ दिवसानंतर एका सुंदर पुत्ररत्नाचा जन्म झाला. बारा दिवसानंतर बाळाचे बरसे करून बाळाचे 'मीननाथ' असे नामकरण केले. आनंदाप्रीत्यर्थ याचकांना अपार धनदान केले. मीननाथच्या रूपाने उपरिचर वासू अंशावताराने जन्माला आले. पाहता पाहता तीन वर्षांचा काळ भुर्रकन उडून गेला. सुखाच्या काळाचे असेच असते.

कलियुगाच्या प्रारंभ होऊन दोन हजार सातशे वर्षे उलटून गेली आहेत. पराक्रमी कुरुवंशीय जनमजेय राजाच्या हस्तीनापुर नगरीत बृहदेव राजा राज्य करीत असतांना त्याने सोमयाग यज्ञाचे आयोजन केले होते. बृहदेव म्हणजे जनमजेयाच्या वंशावळीतला सातवा पुरुष. देशोदेशीचे ब्रह्मवृंद या यज्ञाचे पौरोहीत्य करण्यासाठी आले होते. सातत्याने एक वर्ष यज्ञ कुंडात आहुती दिल्या जात होत्या. फार पूर्वी श्रीशिवाने कामवासनेवर क्रोधीत होऊन स्वतःच्या तिसऱ्या नेत्राद्‌वारे अग्नीशलाका सोडून मदनला भस्म केले होते. त्यवेळी तो कामरूपी मदन अग्नीच्या देहात शिरून सूक्ष्मपणे वास्तव्य करून होता. एक वर्ष चालेल्या यज्ञ आहुतीने संतुष्ट होऊन अग्निदेव प्रकट झाला. त्याच्या देहातील शिवकायेच्या मदनात अंतरिक्ष नारायणाने संचार करून देहधारणा केली होती. अग्निदेवाने त्या तेजःपुंज बालकाचा गर्भ यज्ञकुंडात बाहेर टाकला. यज्ञसमाप्तीनंतर रक्षा बाहेर काढत असताना पुरोहिताच्या हातास ते बालक लागले. बाहेर काढताच ते मधूर आवाजात रडावयास लागले. पुरोहित आश्चर्यचकित होऊन म्हणाला; "महाराज! हे पहा यज्ञकुंडातून प्रसादरूपाने बालक सापडले आहे." महाराज बृहदेवांसह सर्वजण त्या तेजस्वी आणि देखण्या बालकास पाहुन अचंबित झाले. एकंदरीत समुद्रमंथनातून चौदा रत्ने प्राप्त झाल्यानंतर देवांना आनंद झाला होता. किंवा शुक्राचार्यांकडून संजीवनी

विद्या प्राप्त केल्यानंतर इंद्राला, कौसल्येच्या उदरी राम जन्म झाल्यानंतर दशरथाला जसा आनंद झाला होता, तसाच आनंद बृहद्रव्याला झाला होता. मदनाच्या पुतळ्यासारखे देखणे बाळ हातात घेऊन तो वारंवार त्याचे मुके घेऊ लागला. खरं तर ते बाळ म्हणजे साक्षात शिवाच्या देहातील मदनच होता. महाराजांनी अत्यानंदाने घाईघाईत अंतःपुरात जाऊन महाराणी सुलोचनाच्या हातांत ते बाळ दिले. ते गोजिरवाणे सुस्वरूप बाळ पाहून तिने विचारले, "महाराज! उगवत्या सूर्यासारखे हे तेजस्वी बालक कुणाचे आहे?

महाराज म्हणाले, "अगं सुलोचना! हा बाळ यज्ञकुंडातून प्रसाद म्हणून लाभला आहे. आता हा आपलाच आहे. आपल्या मिनकेत पुत्राला हा धाकटा भाऊ मिळाला. अग्नीकुंडातून प्रकट झालेला हा दिव्य अवतारी बालक आहे." महाराणीने ममतेने बाळाला हृदयाशी कवटाळले. बळाचा स्पर्श होताच सुलोचनेला पान्हाच फुटला. स्तनाग्र मुखात घालताच बाळ दुग्धपान करू लागला. बाराव्या दिवशी सुवासिनिंना बोलावून त्याचे बारसे केले. अग्नीच्या ज्वालांत जन्म झाला म्हणून 'जालिंदर' असे नामकरण करण्यात आले. सर्व राज्यात हत्तीवरून साखर वाटण्यात आली. याचकांना धनदान करण्यात आले.

जालिंदर दिसामासी कलेकलेने वाढत होता. राजमहालात तो सर्वांना प्रिय झाला होता. योग्य वयात मौजीबंधन झाले. त्यानंतर लग्नाचे वय होताच महाराजांनी त्याच्यासाठी वधुसंशोधनास सुरुवात केली. राजाचे महामंत्री आणि पुरोहित देशोदेशी रूपवंत, गुणवंत, सुलक्षणी, कुमारी शोधण्यासाठी दौरे करीत होते.

एके दिवशी महाराणीसमवेत बसला असतांना जालिंदरने विचारले, "माताश्री! पुष्कळ दिवसांपासून महामंत्रीजी दिसत नाहीत. कुठे गेले आहेत?" महाराणी म्हणाली, "राजकुमार! तुमचा विवाह करण्याचे महराजांनी निश्चित केले आहे. त्यासाठी वधु शोधण्याच्या निमित्ताने महामंत्र्यांना आणि पुरोहितांना पाठविण्यात आले आहे. जालिंदरांना विषय समजला नाही.

"माताश्री, वधु म्हणजे काय?

"अरे! वधु म्हणजे बायको!!"

"माताश्री! मला दाखवाल, बायको कशी असते?"

"कशी म्हणजे? अगदी माझ्यासारखी! जशी तुझ्या तातश्रींची मी बायको आहे. तशी तुला एक बायको करून द्यावयाची आहे." राजकुमार जालिंदरला काहीही बोध झाला नाही. राजवाड्यात अन्य मुलांबरोबर खेळत असतांना त्याने सवंगड्यांना विचारले, "गड्यांनो! तातश्री मला बायको करून देणार आहेत, ती कशाला? तिचा काय उपयोग असतो? मला कुणी सांगेल का?" ते सवंगडी खीदळळे, आणि म्हणाले, "अहो राजकुमार! बायको कशासाठी असते ते ही तुम्हाला समजत नाही? संसार! संसार करण्यासाठी, विषय सुख भोगण्यासाठी बायको असते."

"विषयसुख म्हणजे काय असते? मला समजावून सांगा ना?" जालिंदरच्या अज्ञानाची कीव करत, त्या मुलांनी कपाळावर हात मारला. मग त्यांनी स्त्रीपुरुष संबंधाबद्दल शब्द, खाणाखुणा, हावभाव करून विषय रंगवला. ही विचित्र माहिती ऐकून जालिंदर थरथरून गेला. मनात म्हणाला, "अरेरे! जग हे फार पापकर्म करीत आहे. आईसारखीच बायको असते. मग जगत् उत्पत्तीस्थानीचे असले किळसवाणे उपभोग घेणारे अधमच म्हणावे. आपण मात्र असले निच कृत्य

करवयाचे नाही" असा विचार करून जालिंदर गुपचूपपणे राजधानीतून बाहेर पडून अरण्यात निघाला राजकुमाराला अडविण्याचे धाडस रक्षकांना झाले नाही. परंतु राजकुमार एकटाच जात असल्याने त्यांनी गुपचूपपणे पाठ्लागावर हेर पाठविला. तसेच तातडीने ही घटना महाराजांना कळवली. महाराजही तातडीने आले. सर्वांनी खूप शोध घेतला. परंतु राजकुमार सापडला नाही. पाठलाग करीत जो हेर पाळती वर होता, तिथपर्यंत मार्ग सापडला नाही. परंतु हेराची आणि राजकुमाराची चुकामुक झाली आणि शोध दुरावला. निराश होऊन सर्वजण परतले. अमावास्येच्या काळ्याकुट्ट रात्रीत चंद्राचा मागमूस नसतो, तसेच झाले. जालिंदराचे सुस्वरूप आणि त्याच्या बाळलीला आठवून परिवार अश्रू ढाळत होता. राजा आणि महाराणी सुलोचना यांच्या शोकाला तर पारवार राहिला नाही. अग्नीनारायणाने दिलेला प्रसाद नाहीसा झाला. मी किती दुर्दैवी आहे. असे म्हणून महाराज बृहद्रवा व्याकूळ होऊन रुदन करीत राहिला. राजा आणि राणींना कसे शांत करवयाचे हे कुणालाच सुचेना. एका सूज्ञ आणि अनुभवी सरदाराने महाराजांची समजूत घातली. तो म्हणाला, "महाराज आणि महाराणी साहेबा! आपले दुःख आवरा. राजकुमार हा दिव्य अवतारी असल्याने त्याला कालत्रयी मृत्युभय नाही. त्याचा शोध आम्ही करीत राहणारच आणि आज ना उद्या, केव्हातरी तुमचा सुपुत्र तुम्हाला भेटेल. तेव्हा वृथा अनिष्ट चिंतन करणारा शोक आवरता घ्यावा." सरदाराच्या भाष्याने राजाराणीच्या पुत्रभेटीच्या आशा पल्लवित झाल्या आणि शोकही कमी झाला.

आता जालिंदरावर काय प्रसंग ओढवला ते पहा. राजमहलातून उद्वेगाने बाहेर पडलेला जालिंदर वस्ती संपल्यावर घनदाट अरण्यातून चालत राहिला. दऱ्या डोंगर ओलांडून उत्तर दिशेने मार्गक्रमण करीत होता. सूर्यास्तानंतर अरण्यात काळोखी रात्र दाटली. अथक चालण्याच्या श्रमामुळे त्याला विलक्षण थकवा आला होता. एका दरीमध्ये तो पहुडला आणि त्याला गाढ निद्रा लागली. मध्यरात्री जंगलात भयानक वणवा भडकला. निसर्गसंपत्तीचा  ह्रास करीत पावलापावलाने पुढे सरकत आगीच्या ज्वाला जालिंदरसमीप पोहोचल्या पण हा आपला पुत्र आहे, हे अग्नी नारायणाने ओळखले. अग्नीदेव प्रत्यक्षात प्रकटले. त्यांनी त्याला हलवून जागे केले आणि विचारले, "या इथे तू एकता कसा?" त्यावर जालिंदर म्हणाला, "महाराज! आपण कोण? त्याचा परिचय द्यावा."

अग्नीनारायण उत्तरले, "वत्सा! मी तुझा जननीजनक आहे. मला अग्नीदेव म्हणतात." अग्नीदेवाच्या उत्तराने विस्मित झालेल्या जालिंदरने विचारले, "अग्नीदेवा! तुम्हाला माझा नमस्कार. पण जननीजनक एक कसा असू शकेल?" त्यावर अग्नीदेवाने पूर्वइतिहास सांगून त्याचा संशय दूर केला आणि स्वतःची खरी ओळख करून दिली.

फलश्रुती: ह्या अध्यायाच्या पठणाने अग्नीभय नष्ट होईल. तसेच संतती आणि संपत्ती प्राप्त होईल.